# बेनी बनीचे तीन रंग


लेखिका: **सारा ऍशरॉन**

चित्रे व सजावट: **एलिझाबेथ डॉबर**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**




# बेनी बनीचे तीन रंग

लेखिका: **सारा ऍशरॉन**

चित्रे व सजावट: **एलिझाबेथ डॉबर**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**





बेनी नावाचा एक छोटासा ससा होता.

काही ससे शेतात राहतात.




काही ससे पाळीव प्राण्यांच्या दुकानात राहतात.



एखादेवेळी एखादा ससा एखाद्या मुलासोबत

किंवा मुलीसोबत घरातही राहतो.





बेनी बनी शेतात राहत नव्हता.

तो पाळीव प्राण्यांच्या दुकानात

किंवा घरातही राहत नव्हता.

बेनी बनी बर्फाळ प्रदेशात

राहणारा ससा होता.

तो उत्तरेकडच्या अति थंड प्रदेशात राहत असे.

बर्फात चालण्याचे बूट असे दिसतात.



ते घालून माणसाला कितीही बर्फ पडला

तरी बर्फातून चालता येते.

‘स्नो शु’, म्हणजे बर्फात राहणाऱ्या

सशाचे पाय असे दिसतात.



बर्फात चालण्याचे बूट घातल्यासारखेच

त्याचे पाय दिसतात.





उत्तरेकडच्या थंड प्रदेशात  राहणारे ससे

हिवाळ्यात पडलेल्या बर्फावरून

उड्या मारू शकतात आणि जोरात पळूही शकतात.



पण आता उत्तरेकडच्या प्रदेशात

उन्हाळा होता.

बेनी बनीचा हा पहिला उन्हाळा होता.

उन्हाळ्यात

उत्तरेकडची जमीन मातकट,
तपकिरी  रंगाची दिसते.

बेनी बनीचा रंगही तसाच होता.

जमिनीच्याच रंगाचा.



त्याला घुबडाकडे लक्ष ठेवावं लागत असे.





बेनी बनी लहानच होता,

त्याला पळायला आणि खेळायला
खूप आवडायचं.

पण त्याला नेहमी

सगळीकडे लक्ष ठेवावं लागायचं.



कोल्हा येतोय का याकडेही

त्याला लक्ष ठेवावं लागे.





शिवाय मोठ्या अस्वलाकडेही

त्याला लक्ष ठेवावं लगे.

त्यांना सगळ्यांनाच एखादा गलेलठ्ठ

बर्फातला ससा पकडायचा असायचा.



पण बेनी बनीला त्यांची भीती वाटत नव्हती.

तो खूप जोरात पळत असे.

त्याला एखाद्या तपकिरी रंगाच्या झाडात लपता येत असे.



छोट्याशा तपकिरी झुडुपात लपलेला लहानसा तपकिरी ससा कुणालाच दिसायचा नाही.



एक दिवस काय झालं,

मोठ्या अस्वलाला बेनी बनी खेळताना दिसला.

अस्वल ओरडून म्हणालं,

“आता मी तुला पकडणार!”

बेनी बनी पळत सुटला.

आणि ते देखील किती जोरात!



तो पळत पळत एका लहानशा तपकिरी
झुडुपात गेला.

अस्वल इकडे तिकडे पाहू लागले.

“हा ससा गेला कुठे?”

अस्वल म्हणाले.

“आता तर इथे होता.”





लहानशा तपकिरी झुडुपात लपलेला

लहानसा तपकिरी ससा

त्याला दिसलाच नाही.

“कधी तरी मी त्याला पकडेनच!”

अस्वलाने विचार केला.

आणि अस्वल तिथून निघून गेले.

“माझ्या  अंगावरचे केस छान आहेत!”

बेनी बनीने विचार केला

आणि  त्याला आता भीती वाटेना.

पण एक दिवस त्याची आई म्हणाली,

“आता लवकरच उन्हाळा संपणार आहे,

बेनी बनी,

तुझ्या अंगावरच्या केसांचा रंग पण बदलेल,

तो ही अगदी योग्य वेळीच!”

बिचारा बेनी बनी.

नवे केस!

“पण मी त्याचं काय करू?”

त्याच्या मनात विचार आला.

“मग मला कोल्हा, घुबड आणि अस्वलापासून

लपता कसं येईल?”







लवकरच उत्तरेच्या प्रदेशातील थंडी

आणखी आणखी वाढू लागली.

अधून मधून थोडं फार

बर्फही पडू लागलं.



एक दिवस आई म्हणाली,

“मला तुझ्या अंगावरचे केस वाढायला लागलेले दिसतात.

मधेच थोडेसे पांढऱ्या रंगाचे केसही दिसायला लागलेत.”



बिचारा बेनी बनी.

“आता काय होईल?”

त्याच्या मनात विचार आला.

“आता मी करू तरी काय?”



थोड्याच दिवसात आई म्हणाली,

“आता मला तुझ्या अंगावर आणखी पांढरे केस दिसताहेत.

आता तुझा रंग पांढरा आणि तपकिरी दिसतोय.

आणि तुझे केसही खूप लवकर वाढताहेत.”

बेनी बनीला घुबडाची आठवण झाली.

त्याला कोल्ह्याची आणि मोठ्या
अस्वलाचीही आठवण आली.

म्हणून मग तो खेळायला गेलाच नाही.





पण एक दिवस त्याला बाहेर जावंच लागलं.

आई बरोबर जाऊन

त्याला अन्न  शोधायचं होतं.

घरी परत येताना त्यांना दिसला कोल्हा.

“पळ!” आई ओरडून म्हणाली.





बेनी बनी आणि त्याची आई पळू लागले.

किती जोरात पळाले ते!

ते एका लहानशा झुडुपात लपले.



“अगदी हलू नकोस!” आई म्हणाली.

“म्हणजे कोल्ह्याला आपण सापडणार नाही!”

“”सापडू की!” बेनी बनीला रडू आलं.

“माझा रंग आता पांढरा आणि तपकिरी आहे.

त्याला मी दिसेन!”



“बेनी बनी, नीट सगळीकडे पहा”

आई म्हणाली.

बेनी बनीने इकडे तिकडे पाहिले.

आणि त्याला नवलच वाटले.

आजूबाजूचा सगळा परिसर आता

पांढरा आणि तपकिरी दिसत होता!

अधून मधून

काही तपकिरी झुडुपे होती.

आणि अधून मधून पांढऱ्या रंगाचा बर्फ.





बेनी बनी अगदी खुश झाला.

भोवतालचा प्रदेश आता पांढरा आणि तपकिरी होता

आणि त्याचा रंगही तसाच होता.



तो दिवसभर परत खेळायला गेला.



“आता मी कोणालाच सापडणार नाही!”

बेनी बनीने विचार केला.

“आता मी कोणालाच सापडणार नाही!”





एक दिवस मोठं अस्वल त्याला पकडायला आलं.

पण छोटा ससा

पळत जाऊन एका झुडपात लपला.

“हा ससा गेला कुठे?”

अस्वल म्हणालं.

“आता तर इथेच होता!”

पण पांढऱ्या आणि तपकिरी झुडुपात लपलेला

पांढऱ्या आणि तपकिरी रंगाचा ससा त्याला दिसलाच नाही.

आणि अस्वल तिथून निघून गेलं.

“माझा रंग आता छान झाला आहे!”

बेनी बनीने विचार केला.

आता त्याला भीती वाटत नव्हती.





उत्तरेच्या प्रदेशात

आता खूपच थंडी होती.

एक दिवस आई म्हणाली,

“लवकरच हिवाळा येणार आहे,

बेनी बनी तुझा रंग आता बदलतो आहे.

आणि तो देखील अगदी योग्य वेळी!”



नवा रंग!

“अरे बापरे, नको!” बेनी बनीच्या मनात

विचार आला.

“मला आता आणखी नवा रंग नको.

माझा रंग आहे तोच छान आहे.”

त्याला आता परत भीती वाटू लागली.



बेनी बनी परत बाहेर जाईना.

अनेक दिवस तो घरातच बसून राहू लागला.

“चल माझ्याबरोबर,”

आई म्हणाली.

“नाही. आज नको.” बेनी बनी म्हणाला.





मग आई म्हणाली, “अरे बेनी बनी,

असं काय करतोस? काय झालंय ?”

मग त्याने आईला सांगितले,

“मला भीती वाटते.

माझ्या नव्या रंगाची मला भीती वाटते.”



एक दिवस मग परत आई म्हणाली,

“अरे, माझ्याबरोबर चल.”

बेनी बनी परत म्हणाला,

“आज नको.”



आई म्हणाली, “बेनी बनी,

माझ्याकडे बघ.

माझा नवा रंग बघ.”

आता बेनी बनीने पहिले,

त्याच्या आईचा रंग आता पूर्ण पांढरा झाला होता.

“तुझा पण नवा रंग आता पांढरा झाला आहे,

आणि किती छान दिसतोय,” आई म्हणाली.

पांढरा रंग!

बेनी बनी रडायलाच लागला.

“बेनी बनी, अरे घाबरू नकोस,”

आई म्हणाली.







“तुझा रंग खूप छान आहे.

आणि एकदा तुझ्या पायाकडे बघ तरी!”

त्याचे पाय आता बर्फात चालण्याचे  बूट

घातल्यासारखे दिसत होते

ते पाहून बेनी बनीला आश्चर्यच वाटले.

आई म्हणाली,

“बघ!

आता तू तयार झाला आहेस.”

“तयार?

आणि कशासाठी?” बेनी बनीने विचारले.

“इकडे ये, आणि बघ,

बाहेर पहा तर खरं,” आई म्हणाली.











बेनी बनीने बाहेर पहिले

आणि तो ओरडला, “अरे वा!”

काय नवल आहे!

सगळं जग बर्फ पडून पांढरं झालं होतं,

अगदी त्याच्या नव्या रंगासारखं!



“बघ,” आई म्हणाली.

तुझ्या पायात बर्फावर पळण्याचे बूट आहेत

आणि तुझा रंगही अगदी बर्फासारखाच आहे.

आता इथल्या थंडीसाठी

तू तयार आहेस.”

“हो! चल मग!”

बेनी बनी खुषीने ओरडला.

“चल, जाऊया! चल लवकर!”

आणि तो पांढऱ्या बर्फात

बाहेर पळाला.

समाप्त

